**मत्स्यव्यवसाय विभागामार्फत विविध योजनांतर्गत घेण्यात येणाऱ्या मत्स्यबंदरे व जेट्टी विकासाची कामे पूर्ण करण्याकरीता प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेची नेमणूक करणेबाबत........**

# महाराष्ट्र शासन
## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१३१४/प्र.क्र.१३६/पदूम-१४

मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ००३२
तारीख: १६ ऑगस्ट,२०१४

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्याला ७२० कि.मी लांबीचा सागरी किनारा लाभला असून सावंतवाडी ते गुजरात सीमेपर्यंत याची व्याप्ती आहे. सागरी मासेमारी व्यवसायास चालना देण्यासाठी व मच्छिमारांचा सर्वांगिण विकास करण्यासाठी त्यांना पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्याच्या उद्देशाने मासेमारी बंदर विकास तसेच मासळी उतरविण्याच्या ठिकाणी जेट्टी व इतर मुलभूत सुविधा पुरविण्याची कामे हाती घेण्यात आली आहेत. सद्य:स्थितीत, या विभागास राष्ट्रीय कृषी विकास योजना, ग्रामिण पायाभूत विकास निधी अंतर्गत नाबार्डचे अर्थसहाय्य तसेच केंद्र शासनाकडून निधी प्राप्त होत असून या निधीचा उपयोग हा मासेमारी बंदरे, जेट्टींचा आणि बंदराचा आधारभूत सुविधांचा तसेच मत्स्यव्यवसाय संबंधीत लोकांचा सर्वांगीण विकासासाठी केला जातो. सद्यस्थितीत सदर कामे सार्वजनिक बांधकाम विभाग व महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांचेमार्फत  केली जातात. परंतु सदर कामांवर मत्स्यव्यवसाय विभागाचे पूर्णत: नियंत्रण आवश्यक आहे. मा. केंद्रीय कृषी मंत्री यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या दि. ११.०६.२००५ च्या बैठकीमध्ये मत्स्यव्यवसाय विभागामार्फत स्वतंत्र यंत्रणा निर्माण करून ही कामे करण्यासंदर्भांत सूचना दिलेल्या आहेत. कर्नाटक, केरळ, तामिळनाडू आणि आंध्रप्रदेश येथील राज्यांनी महाराष्ट्र राज्यापेक्षा जलदगतीने बंदरांचा आणि मासेमारी व्यवसायाचा विकास केला आहे, असे दिसून येते. कारण या राज्यांमध्ये विभागातील बहुतांशी कामे सल्लागारांमार्फ़त करुन घेतली जात आहेत. त्याच धर्तीवर मत्स्यव्यवसाय विभागामार्फत राज्यातील मच्छिमारांच्या सर्वागिण विकासासाठी व मुलभूत पायाभूत सुविधा निर्माण करणेसाठी केंद्र शासनाच्या अनेक योजनेतून मिळणारा निधी खर्च करणेसाठी प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाची (Project Management consultant) नेमणुक करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय-

मत्स्यव्यवसाय विभागामार्फत विविध योजनांतर्गत घेण्यात येणाऱ्या मत्स्यबंदरे व जेट्टी विकासाची कामे पूर्ण करण्याकरीता प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेची नेमणूक करणेबाबत शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. आयुक्त,मत्स्यव्यवसाय यांचे स्तरावर निविदा प्रक्रीया राबवून जागतिक बँकेने ठरवून दिलेल्या निकषानूसार प्रकल्प सल्लागार संस्थेची (Project Management consultant) निवड करण्यात येऊन शासनाच्या मान्यतेने अंतिम करण्यात येईल.

३. प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेची (Project Management consultant) कामे पुढीलप्रमाणे राहतील.

१. प्रकल्पासाठी लागणाऱ्या विविध परवानग्या मिळवणे, कामाचे सर्व्हेक्षण करणे इत्यादी.
२. अंदाजपत्रके तयार करणे, निविदा प्रक्रीया पूर्ण करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबींची पुर्तता करणे व यासाठी विविध सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता मिळविणे.
३. कामावर प्रत्यक्ष देखरेख ठेवून कामाचा दर्जा व गुणवत्ता राखणे इत्यादी
४. केलेल्या कामाचे मोजमाप करुन देयके सादर करणे इत्यादी.
५. अंदाजपत्रकांना (सार्वजनिक बांधकाम विभाग नियमावलीनुसार) तांत्रिक मान्यता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य अभियंत्याकडून मिळवणे.
६. कामासंबंधी इतर आवश्यक सर्व कामे

३. प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार कंपनीने सादर केलेल्या अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीनुसार मुख्य अभियंत्याकडून अथवा C.I.C.E.F.बंगळूरू (Central Institute of Costal Engineering for Fishery, Bangalore) यांचेकडून करुन घेण्यात येईल. तसेच सर्व कामाच्या निविदा या आयुक्त कार्यालयामध्ये आयुक्त,मत्स्यव्यवसाय, कार्यकारी अभियंता, मत्स्यव्यवसाय विभाग व सहाय्यक संचालक (वित्त), मत्स्यव्यवसाय विभाग यांचे समितीमार्फत करण्यात याव्यात व सर्व डीटीपीनां मान्यता व काम सुरु करण्याचे आदेश हे कार्यकारी अभियंता यांना असतील. तसेच सर्व सादर केलेल्या सर्व देयकांना मंजुर करण्याचे अधिकार सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमानुसार कार्यकारी अभियंता यांना असतील.

१२. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग करण्यात आलेली सर्व कामे (मिरकरवाडा, जि.रत्नागिरी येथील टप्पा-२ चे काम वगळून) तात्काळ आयुक्त कार्यालयाकडे वर्ग करण्यात यावीत. किनारी अभियंताकडे सद्य:स्थितीत सुरू असलेली सर्व कामे त्यांच्या विभागामार्फत करावयाची आहेत. कामाची निकड लक्षात घेऊन काही कामे किनारी अभियंता यांचेकडे वर्ग करणे आवश्यक असल्याचे मत आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी दिल्यास, शासनस्तरावर सदर कामे किनारी अभियंता यांचेकडे वर्ग करण्यात

येतील. तथापि किनारी अभियंता यांचेमार्फत सुरू असलेल्या कामांची प्रगती असमाधानकारक असल्याचे आढळून आल्यास सदर कामे आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचेकडे वर्ग करण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१६१५५६१४९२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

Shahabuddin Parvez A

Digitally signed by Shahabuddin Parvez A
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRI and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shahabuddin Parvez A
Date: 2014.08.16 15:55:02 +05'30'

**(प.श.अहमद)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. सह आयुक्त (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय,मुंबई
४. मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
५. किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
६. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
७. सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई /मुंबई उपनगर/ ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/ सिंधुदूर्ग,

**प्रत माहितीसाठी**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा.मंत्री,पदुम यांचे खासगी सचिव
५. मा.राज्यमंत्री,मत्स्यव्यवसाय यांचे खासगी सचिव
६. सर्व विधीमंडळ सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७. सचिव (पदूम) यांचे स्वीय सहायक
८. उपसचिव (मत्स्य) यांचे स्वीय सहायक
९. निवडनस्ती, पदुम१४.